**परराष्ट्र व्यवहार मंत्रालयाशी संबंधित**
**कामकाजाचे समन्वय करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०१०/प्र.क्र.९/१०/१८ (र. व का.),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २ मार्च, २०१०.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य हे प्रगतीशील राज्य आहे. मुंबई हे शहर देशाची आर्थिक राजधानी म्हणून ओळखली जाते. मुंबई शहराबरोबरच राज्यातील पुणे, नागपूर, औरंगाबाद, नासिक इ. शहरे वेगाने विकसित होत आहेत. महाराष्ट्र राज्यातील नागरिक नोकरी, व्यवसाय, शिक्षण, कलेचा प्रसार इ.साठी परदेशात जातात. तर याच प्रयोजनासाठी जगातील अन्य देशाचे नागरिक महाराष्ट्र राज्यात येतात. त्यातून महाराष्ट्रातील नागरिकांचे जगातील अन्य देशांशी तर जगातील अन्य देशातील नागरिकांचे महाराष्ट्र राज्याशी राजकीय, व्यापारी, औद्योगिक, शैक्षणिक संबंध प्रस्तावित झालेले आहेत आणि त्यात सतत वाढ होत आहे.

जगातील अन्य देशांशी राजकीय, व्यापारी, औद्योगिक, शैक्षणिक संबंध ही बाब केंद्र शासनाशी संबंधित असून ती परराष्ट्र व्यवहार मंत्रालयाकडून हाताळली जाते. महाराष्ट्र राज्याचे जगातील अन्य देशांशी विविध क्षेत्रात प्रस्थापित झालेले संबंध पाहता राज्यात येणारे परदेशी नागरिक वा राज्यातून परदेशात जाणाऱ्या नागरिकांसंदर्भात उद्भवणाऱ्या समस्या/अडचणी यांचे निवारण जलद गतीने व्हावे. यासाठी परराष्ट्र व्यवहार मंत्रालय, नवी दिल्ली आणि राज्य शासन यांच्यात समन्वय असणे आवश्यक आहे. त्यासाठी समन्वय अधिकारी नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

वरील पार्श्वभूमी विचारात घेऊन राज्य शासनाच्या परराष्ट्र व्यवहार मंत्रालयाशी होणाऱ्या कामकाजाचे समन्वय करण्यासाठी, मुख्य राजशिष्टाचार अधिकारी व प्रधान सचिव (राजशिष्टाचार) सामान्य प्रशासन

**(कृ.मा.प...**

विभाग यांची समन्वय अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३०२१५५७३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( सुधीर ठाकरे )**
**सचिव (प्र.सु.व र.व का.)**

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
शासनाचे मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा,मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
*प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय,
*सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
*मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
(त्यांना विनंती करण्यात येते की, सदर शासन निर्णय त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख / प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख यांना कळविण्यात यावा.)
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (कार्यासन १८)

---

* पत्राने